201103231531120001

राज्यातील नगरपरिषदांना वैशिष्टयपूर्ण कामांसाठी विशेष अनुदान वितरीत करण्याबाबत .....
(फेब्रुवारी -२०११)

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्र. वैशिअ-२०१० /प्र.क्र. १३२/नवि-१६ (iii)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : १० फेब्रुवारी, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय,नगर विकास विभाग, क्र संकीर्ण -१०२०००/प्र.क्र.४०/२०००/नवि-४, दिनांक २५ फेब्रुवारी, २०००

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अंदाज- २०१०/प्र.क्र. ६५/२००९ अर्थसंकल्प-३, दिनांक ०३ एप्रिल, २०१०.

३) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांक अंदाज २०१०/प्र.क्र. ७१/२०१० अर्थसंकल्प-३, दिनांक १८ मे, २०१०.

४) शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक वानियो-२०१०/प्र.क्र ६३/नवि-९, दिनांक ०९ जून, २०१०.

**शासन निर्णय :-** राज्यातील नगरपालिकांना वैशिष्टयपूर्ण कामांसाठी विशेष अनुदान देण्याच्या योजनेअंतर्गत शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक संकीर्ण-१०२०००/प्र.क्र. ४०/२०००/नवि-४, दिनांक २५ फेब्रुवारी, २००० मध्ये नमूद केलेल्या निकषांच्या अनुषंगाने सोबत जोडलेले विवरणपत्र- ब मधील एकूण ९ नगरपालिकांना वैशिष्ट्यपूर्ण कामासाठी विशेष अनुदान रुपये ४,५०,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी पन्नास लाख फक्त ) वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यांत येत आहे.

०२. वैशिष्टयपूर्ण कामांसाठी विशेष अनुदान योजनेअंतर्गत नगरपरिषदांनी हाती घेण्याचे ठरविलेल्या विशेष कामाचे आराखडे / नकाशे तयार करुन व खर्चाचे अंदाजपत्रक आणि सदर कामाच्या अनुषंगाने जमा करावयाची १०% वर्गणी नगरपरिषदांनी देण्याचा ठराव संबंधित जिल्हाधिकारी यांना सादर केल्यावर जिल्हाधिकारी यांनी सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्याशिवाय कोणत्याही नगरपालिकेने काम सुरु करु नये.

३. उपरोक्त निधी संबधीत नगरपरिषदांना वितरीत करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई यांना " आहरण व संवितरण " अधिकारी म्हणून व आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई यांना " नियंत्रण अधिकारी

" म्हणून घोषित करण्यांत येत आहे. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी सदर एकत्रित निधीचा धनादेश आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई यांच्या नांवे काढून तो संचालनालयास देण्यांत यावा. संबधित नगरपरिषदांना निधीचे वितरण आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई यांनी तात्काळ करावे. तसेच ज्या जिल्ह्यामध्ये निवडणूक आचारसंहिता सुरु आहे, त्या जिल्ह्यातील नगरपरिषदांना निधी वितरणापूर्वी आचारसंहितेचा भंग होणार नाही, याची दक्षता नियंत्रण अधिकारी यांनी घ्यावी.

४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक एफ-२, "२२१७" नगर विकास, ८० सर्वसाधारण १९२, नगरपरिषदांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ३१,सहाय्यक अनुदान (००)(४२) नगरपरिषदांना वैशिष्टयपूर्ण कामांसाठी विशेष अनुदान (२२१७१३०१)" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५१/व्यय-३ दिनांक ०९ फेब्रुवारी, २०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आय.एम. मोरे)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री ( नगर विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०३०(५ प्रती ),
महालेखापाल,महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल,महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सबंधित जिल्हाधिकारी
संबंधित मुख्याधिकारी
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन, नवी मुंबई,
वित्त विभाग ( व्यय-३, अर्थसंकल्प-१५ / अर्थोपाय शाखा )
अवर सचिव (नवि-४)/लेखाधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग,
निवड नस्ती नवि-१६.

शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्र.: वैशिअ-२०१० /प्र.क्र. १३२/नवि-१६,
दि. १० फेब्रुवारी २०११ सोबतचे

## विवरणपत्र ब

| अ. क्र. | जिल्हा | नगरपरिषदेचे नाव | वितरीत करावयाची रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रत्नागिरी | रत्नागिरी | ५० |
| २ | जळगांव | सावदा | ५० |
| ३ | पूणे | बारामती | ५० |
| ४ | सांगली | तासगांव | ५० |
| ५ | सोलापूर | कुर्डूवाडी | ५० |
| ६ | कोल्हापूर | जयसिंगपूर | ५० |
| ७ | नांदेड | धर्माबाद | ५० |
| ८ | लातूर | औसा | ५० |
| ९ | अमरावती | चांदुर रेल्वे | ५० |
| | एकुण | | ४५० |

----------